**उप सचिवांचे पद श्रेणी वाढ करुन सह सचिव पदात रुपांतरीत करणे व सदर रुपांतरीत पदावर श्रीमती स्मि.श.रानडे, सहसचिव यांची नियुक्ती करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग

### शासन निर्णय क्रमांकः आस्थापना-२०१४/प्र.क्र.७३/आस्था-१

मंत्रालय, विस्तार भवन, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०६.०८.२०१४

**वाचा :**

1. **सामान्य प्रशासन विभागाचे आदेश: क्र.उसप-१३१४/प्र.क्र.१४/१४/का.१४, दि.३१.०५.२०१४**
2. **कार्यालयीन आदेश, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र.आस्थापना-२०१४/प्र.क्र.७३/आस्था-१, दि.२१.०६.२०१४.**

**शासन निर्णय :**

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र.१ येथील दि.३१.०५.२०१४ च्या आदेशान्वये श्रीमती स्मि.श.रानडे, सह सचिव यांची आंतरविभागीय बदलीने या विभागात उपसचिव संवर्गातील रिक्त पदावर पदस्थापना करण्यात आली आहे. त्यानुसार संदर्भ क्र.२ येथील विभागाच्या दि.२१.०६.२०१४ च्या आदेशान्वये श्रीमती स्मि.श.रानडे, सह सचिव यांना या विभागात दि.१७.०६.२०१४ (म.पू.) पासून रुजु करुन घेण्यात आले आहे. तथापि, या विभागात सह सचिवांचे पद उपलब्ध नसल्याने उप सचिव संवर्गातील वेतनबँड रु.१५६००-३९१०० + ग्रेड पे रु.७६००/- मधील रिक्त पद वेतन बँड रु.३७४००-६७००० + ग्रेड पे रु.८७००/- मध्ये श्रेणी वाढ करुन दि.१७.०६.२०१४ (म.पू.) पासून सह सचिव या पदात रुपांतरीत करण्यात येत आहे. रुपांतरीत झालेल्या सदर पदावर श्रीमती स्मि.श.रानडे, सह सचिव यांची दि.१७.०६.२०१४ (म.पू.) पासून पदस्थापना करण्यात येत आहे. सह सचिव पदात श्रेणीवाढ केलेले पद श्रीमती स्मि.श.रानडे, सह सचिव ह्या त्या पदावर कार्यरत असेपर्यंतच अस्तित्वात राहील त्यानंतर ते मूळ पदामध्ये रुपांतरीत होईल.

२. यावरील होणारा खर्च सन २०१४-१५ या आर्थिक वर्षामध्ये मंजूर झालेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. सदरहु शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक २०३/२०१४/सेवा-९, दिनांक ०८.०७.२०१४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८०५१६४७००७४२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Uttam Shivaram Lonare

Digitally signed by Uttam Shivaram Lonare
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice &Spl Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Uttam Shivaram Lonare
Date: 2014.08.11 16:33:39 +05'30'

**(उ.शि.लोणारे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
३. श्रीमती स्मि.श.रानडे, सह सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. सर्व उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. अवर सचिव (लेखाशाखा), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
६. उप सचिव (का-१४), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७. उप सचिव (का-सेवा-९), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८. मा.सचिव यांचे स्वीय सहायक, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९. निवडनस्ती (का.आस्था-१)